**पैठण नगरपरिषदेस सन २००८-०९ चे थकित यात्राकर अनुदान वितरीत करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय** क्र.जीईएन २००९/प्र.क्र.१३०/नवि-१६
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२. दिनांक २४ फेब्रुवारी, २०१०

**संदर्भ:-** १) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्रमांक: पूरक १००९/प्र.क्र.१८४/नवि-४, दिनांक १८ जानेवारी, २०१०
२) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.नपप्रसं/अर्थ अंदाज/२००९-१०/प्र.क्र.७५/०८, दि.२१ एप्रिल,२००९

**प्रस्तावना:-** उपरोक्त संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये पैठण नगरपरिषदेसाठी सन २००८-०९ मध्ये देय यात्राकर अनुदान उपलब्ध करुन देण्याची विनंती केली होती. त्यानुसार माहे डिसेंबर,२००९ च्या हिवाळी अधिवेशनामध्ये रु.१६,५०,०००/- इतके पूरक अनुदान मंजूर करुन संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन घेण्यात आले आहे. सदर अनुदान पैठण नगरपरिषदेला वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये मंजूर अनुदान रु.१६,५०,०००/- (रुपये सोळा लक्ष पन्नास हजार फक्त) पैठण नगरपरिषदेला उपलब्ध करुन देण्यासाठी आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांना वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

०२. उपरोक्त निधी वितरीत करण्यासाठी **सहाय्यक संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत असून आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.** त्यांनी सदर रक्कमेचे देयक अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई येथे सादर करुन धनादेश प्राप्त करुन घ्यावा.

०३. या प्रयोजनासाठी होणारा खर्च "मागणी क्र.एफ-४, "३६०४ स्थानिक संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे, २००, इतर संकीर्ण नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे (००)(०२) यात्राकर रद्द केल्यामुळे नगरपरिषदांना द्यावयाचे सहाय्यक अनुदान (३६०४०१४७) ३१, सहायक अनुदाने" या लेखाशिर्षाखालील सन २००९-१० च्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

०४.	हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.२७४/१०/अर्थसंकल्प-१६, दिनांक २४/२/२०१० अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( कैलास गायकवाड )
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

सचिव (नवि) यांचे विशेष कार्य अधिकारी, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई ४०० ०२५
सह सचिव (नवि-१६) यांचे स्वीय सहाय्यक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
जिल्हाधिकारी, औरंगाबाद.
महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
मुख्य लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
अवर सचिव/कक्ष अधिकारी(नवि-४)/लेखा अधिकारी (नवि-३१), नगर विकास विभाग
मुख्याधिकारी, पैठण नगरपरिषद, जि.औरंगाबाद.
निवड नस्ती नवि-१६